रासायनिक खताचा संरक्षित साठा करण्याकरीता लागणाऱ्या अनुषंगिक खर्चासाठी दि विदर्भ को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लि, नागपूर यांना निधी उपलब्ध करुन देण्याबाबत -

# महाराष्ट्र शासन
## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
## शासन निर्णय क्रमांकः सपस-२०१४/प्र.क्र.१७०/२४ स,

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख:१९ मार्च, २०१५

**वाचा :-**

१. शासन निर्णय क्रमांक : कृषि व पदुम विभाग क्र. राखते-२०१३/प्र.क्र.८८/१७-अे, दि.३१ मे, २०१३
२. शासन निर्णय क्रमांक : वित्त विभाग क्र.शाहमी-२०१३/ सपवव/प्र.क्र. ४३/ अर्थबळ, दि. २५.७.२०१३
३. शासन निर्णय क्रमांक : सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. सपस-२०१३/प्र.क्र.१८४/२४- स, दि. १४.२.२०१४
४. शासन निर्णय क्रमांक : सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. सपस-२०१३/प्र.क्र.१८४/२४- स, दि. २९.३.२०१४
५. शासन निर्णय क्रमांक : सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. सपस-२०१४/प्र.क्र.२१/२४-स, दि. २९.३.२०१४
६. कार्यकारी संचालक, दि विदर्भ को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लि., नागपूर यांचे जावक क्रमांक : अकौ/२६०८, दि. १२.१.२०१५

**प्रस्तावना :-**

खरीप हंगाम २०१३ करिता विदर्भातील शेतकऱ्यांना वेळेवर रासायनिक खताचा संरक्षित साठा करुन पुरवठा करण्याकरिता दि विदर्भ को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लि., नागपूर या संस्थेची उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. १ नुसार नोडल एजन्सी म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. या कामाकरिता आवश्यक असणाऱ्या कर्जासाठी शासन हमी तसेच अनुषंगीक खर्च या विभागाने उपलब्ध करुन देण्याचा निर्णय कृषि विभागाने घेतला होता. या करिता लागणाऱ्या रु. ७० कोटी रक्कमेच्या कर्जाकरिता वित्त विभागाने शासन हमी संदर्भाधीन अ.क्र. २ नुसार मंजूर केली होती. सदर रासायनिक खताचा साठा व पुरवठा करण्याकरिता येणाऱ्या अनुषंगिक खर्चासाठी सन २०१४-२०१५ च्या अर्थसंकल्पात रु. २२ कोटी रकमेची तरतूद करण्यात आली आहे. या मंजुर निधी पैकी वित्त विभागाने रुपये १,६३,८४,७६२/- (रुपये एक कोटी त्रेसष्ठ लाख चौऱ्याऐंशी हजार सातशे बासष्ठ फक्त ) इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधी दि विदर्भ को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लि., नागपूर या संस्थेला वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

खरीप हंगाम २०१३ साठी विदर्भातील शेतकऱ्यांना वेळेवर रासायनिक खताचा संरक्षित साठा करुन पुरवठा करण्यासाठीच्या योजनेअंतर्गत दि विदर्भ को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लि., नागपूर या संस्थेला रु. १,६३,८४,७६२/- (रुपये एक कोटी त्रेसष्ठ लाख चौऱ्याऐंशी हजार सातशे बासष्ठ फक्त) इतकी रक्कम अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०१४-२०१५ च्या खालील लेखाशीर्षाखाली मंजूर असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

"मागणी क्र. व्ही-२, मुख्यलेखाशिर्ष २४२५, सहकार, (००)(१०८), इतर सहकारी संस्थांना सहाय्य, (०१) पणन सहकारी संस्था, (०१)(२१) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास रासायनिक खते खरेदी व पुरवठा यासाठी येणाऱ्या अनुषंगिक खर्चासाठी अर्थसहाय्य (योजनेतर) (२४२५ २३७३) ३३, अर्थसहाय्य".

३. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या अर्थसहाय्याचा विनियोग ज्या कारणास्तव मंजूर केलेला आहे त्याच कारणासाठी वापर करुन संबंधित फेडरेशनने त्यासंबंधीचा अनुपालन अहवाल विनाविलंब शासनास सादर करावा.

४. या शासन निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या रु. १,६३,८४,७६२/- (रुपये एक कोटी त्रेसष्ठ लाख चौऱ्याऐंशी हजार सातशे बासष्ठ फक्त) चा धनादेश The Vidarbha Co-operative Marketing Federation Limited, Nagpur यांच्या नावे काढण्यात यावा.

५. या शासन निर्णयातील मंजूर करण्यात आलेल्या रकमेचे आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता श्रीमती अ. अ. चुरी, कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी व श्री.रा.स.अटक, उपसचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौसं १२८/१५/व्यय २, दिनांक ११.३.२०१५ अन्वये त्यांच्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१९१५५८१८५३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमीत करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Saguna Dada Kale

Digitally signed by Saguna Dada Kale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Saguna Dada Kale
Date: 2015.03.19 16:08:06 +05'30'

**( सगुणा काळे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), (लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर,
२. अपर मुख्यसचिव (कृषी व पणन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,

३. कृषि आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. कृषि पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
८. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई,
९. वित्त विभाग, (व्यय-२, अर्थसंकल्प-३ व १३), मंत्रालय, मुंबई,
१०. कार्यकारी संचालक, दि विदर्भ को-ऑप. मार्केटिंग फेडरेशन, नागपूर,
११. मा.मंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१२. मा.राज्यमंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१३. कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (३ प्रती),
१४. कक्ष अधिकारी, १७ स/संगणक कक्ष, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
१५. निवडनस्ती.